जीवन शिक्षण मासिकाची वार्षिक वर्गणी वाढविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१२५/प्रशिक्षण**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक:- १० डिसेंबर २०१८**

**वाचा :-**

शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: पीआरई-२०१०/१७५/१०/ प्राशि-५ (एसडी-४), दि.६.१२.२०१३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदेच्या (विद्या प्राधिकरण) प्रसारमाध्यम विभागामार्फत जीवन शिक्षण मासिक प्रकाशित होते. शासनाची ध्येयधोरणे व प्रत्यक्ष कृतिकार्यक्रम आणि अपेक्षित शालेय स्तरांवरील कार्यवाही यांच्यातील मार्गदर्शक मध्यस्थाची भूमिका पार पडत असल्याने जीवन शिक्षण मासिकाला शासनाच्या शालेय विभागाचे मुखपत्र म्हटले जाते.

मे १८६१ मध्ये -पुणे पाठशाला पत्रक॰ या नावाने मासिकाचा पहिला अंक प्रकाशित झाला. या मासिकाला जवळपास १६० वर्षाची गौरवशाली परंपरा असून ऑक्टोबर १९५६ मध्ये जीवन शिक्षण या नावाने हे मासिक प्रकाशित होऊ लागले. महात्मा गांधीजीची जीवन शिक्षण योजना ही नावामागची पार्श्वभूमी आहे. त्यानुसार जीवनासाठी जीवनाद्वारा शिक्षण हे या मासिकाचे ब्रीद आहे.

जीवन शिक्षण मासिकाची छपाई, मुद्रण व कागद यांच्यावरील वाढीव खर्चामुळे अंकाची किरकोळ विक्रीची किंमत तसेच अंकाच्या वार्षिक वर्गणीत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जीवन शिक्षण मासिकासाठी छपाई, मुद्रण व कागद इत्यादीवर होणारा खर्च महागाई मुळे वाढलेले दर विचारात घेता एका अंकाची किरकोळ विक्रीची किंमत रू.२०/- वरून ३०/- करण्याबाबत तसेच सवलतीच्या दरात अंकाची वार्षिक वर्गणी रू.२००/- वरून ३००/- करण्याबाबत महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१०१७२३४८३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban
Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.12.10 17:31:19 +05'30'

**( बी.आर.माळी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग.
२. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे.
४. कार्यासन प्रशिक्षण, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय (निवड नस्ती).